कै.वसंतराव नाईक शेती स्वावलंबन मिशनची पुनर्रचना करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**महसूल व वन विभाग**

**शासन निर्णय क्रमांक :- एससीवाय-२०१५/ प्र.क्र.२४४/म-७**

मंत्रालय, मुंबई-३२

दिनांक :- २४ ऑगस्ट, २०१५

वाचा :- शासन निर्णय क्रमांक :- एससीवाय- १२०५/ प्र.क्र.१२०/शिकाना (म-७), दिनांक १६.१२.२००५.

**प्रस्तावना :-**

गत काही वर्षात राज्यातील शेतकऱ्यांच्या होत असलेल्या आत्महत्या हा शासनासाठी एक चिंतेचा विषय होता. विदर्भातील शेतक-यांच्या आत्महत्यांच्या प्रकरणांची दखल घेऊन त्यावर तातडीची उपाययोजना करण्यासाठी व शेती पिकांसाठी पर्याप्त सुविधा उपलब्ध व्हाव्यात यासाठी शासनाने जाहीर केलेल्या विशेष पॅकेजची अंमलबजावणी करण्यासाठी संदर्भाधीन शासन निर्णयान्वये कै. वसंतराव नाईक शेती स्वावलंबन मिशनची स्थापना करण्यासाठी पद निर्मिती करुन या मिशनची स्थापना करण्यात आली होती. तथापि, या मिशनला देण्यात आलेले मर्यादित अधिकार व अपुरे मनुष्यबळ यामुळे गेल्या अनेक वर्षापासून सदर मिशनच्या कार्यास योग्य ती गती नसल्याचे निदर्शनास आल्याने वरीलप्रमाणे करण्यात आलेल्या उपाययोजनांना गती आणणे क्रमप्राप्त होते. या अनुषंगाने सदर मिशनचे कामकाज अधिक प्रभावीपणे पार पाडण्यासाठी तसेच शेतक-यांना अन्न सुरक्षा, आरोग्य सेवा, शेती विकासाचे कार्यक्रम राबविणे व त्यांच्या मुलांना शिक्षणाची सोय उपलब्ध करुन देणे अशा उपाययोजनांची अंमलबजावणी करण्यासाठी औरंगाबाद व अमरावती विभागातील सर्व जिल्हे व नागपूर विभागातील वर्धा जिल्हा अशा एकूण १४ जिल्ह्यांसाठी मिशनची पुनर्रचना करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

कै. वसंतराव नाईक शेती स्वालंबन मिशनची खालीलप्रमाणे पुनर्रचना करण्यात येत आहे.

| | | |
|---|---|---|
| श्री. किशोर तिवारी (अशासकीय) | - | अध्यक्ष |
| विभागीय आयुक्त, अमरावती | - | कार्यकारी संचालक |
| सह संचालक (सार्वजनिक आरोग्य) अकोला | - | सदस्य |
| सह संचालक (शिक्षण), अमरावती/ औरंगाबाद | - | सदस्य |
| सह संचालक (उच्च शिक्षण),अमरावती/ औरंगाबाद | - | सदस्य |
| उपायुक्त (नागरी पुरवठा), अमरावती/ औरंगाबाद | - | सदस्य |

| | | |
|---|---|---|
| सह निबंधक (सहकारी) संस्था, अमरावती/ औरंगाबाद | - | सदस्य |
| अतिरिक्त आदीवासी आयुक्त (ATC)(ITDP), अमरावती / नागपूर | - | सदस्य |
| सह संचालक (कृषी),अमरावती | - | सदस्य |

**या मिशनच्या कामामध्ये प्रामुख्याने खालील बाबींचा समावेश असेल.**

१) सदर मिशन शासनाच्या खालील योजनांच्या गतीमान व परिणामकारक अंमलबजावणीची समांतर समीक्षा करेल व आढावा घेऊन अंमलबजावणीला गती देईल.

(अ) सर्व गरजु शेतक-यांना अन्न सुरक्षा योजना व राजीव गांधी जीवनदायी योजना.

(ब) आत्महत्या केलेल्या शेतक-यांच्या कुटुंबियांच्या मुलांना मोफत शिक्षणाची योजना.

(क) शेती विकासासंदर्भात सर्व विभागांकडील शासकीय योजना.

(ड) शेतकरी आत्महत्या संबंधातील अस्तित्वात असलेल्या सर्व शासन निर्णयांची संबंधीत विभागाकडून अंमलबजावणी.

(२) अमरावती व औरंगाबाद विभागातील १३ जिल्हे व नागपुर विभागातील वर्धा जिल्हा अशा एकुण १४ जिल्हे या मिशनचे कार्यक्षेत्र राहील.

(३) या मिशनचे अध्यक्ष हे मा. मंत्री (मदत व पुनर्वसन) व मा.मुख्यमंत्री महोदयांना महिन्यातुन एकदा अहवाल सादर करतील.

**मिशनचे नियमनात खालील बाबींचा समावेश असेल.**

१. अध्यक्षपदी श्री.किशोर तिवारी हे पुढील आदेश होईपर्यंत कार्यरत राहतील.
२. अध्यक्षांना राज्यमंत्री दर्जा राहणार असून वित्त विभागाच्या दि.१३.०३.२०१२ च्या शासन निर्णयातील जोडपत्र-१ मधील कलम ७ अन्वये लागू असलेल्या सोयी-सुविधा लागू राहतील.
३. अध्यक्षांना वरील शासन निर्णयानुसार देय मानधन व भत्ते विभागीय आयुक्त, अमरावती यांनी त्यांच्या आस्थापना खर्चाच्या तरतुदीमधुन द्यावयाच्या आहेत. इतर सोयी-सुविधा देखील विभागीय आयुक्त, अमरावती यांनी द्यावयाच्या आहेत्त.
४. मिशनचे केंद्रस्थान अमरावती येथे राहील.

२. कै. वसंतराव नाईक शेती स्वावलंबन मिशन, महाराष्ट्र राज्य, अमरावती, या मिशनचे परिच्छेद १ मध्ये नमूद केल्याप्रमाणे मिशनची रचना व कार्यपद्धती असणार आहे. या मिशनवर श्री. किशोर तिवारी (अशासकीय ) यांची अध्यक्ष या पदावर पुढील आदेशापर्यंत नियुक्ती करण्यात आलेली आहे. यास्तव त्यांना द्यावयाचे मानधन व इतर सोयी सुविधा वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र. शासाउ-

१०.१०/प्र.क्र.९६/१०/सा.उ., दि.१३ मार्च, २०१२ मध्ये नमूद केल्यानुसार देय असेल. मिशनवरील इतर सदस्य, शासकीय अधिकारी असल्याने त्यांना शासकीय नियमाप्रमाणे वेतन व इतर भत्ते देय असल्यामुळे त्यांना मानधन, भत्ते इत्यादी वेगळ्याने देण्याची आवश्यकता नाही.

३. सदरचा शासन निर्णय हा समान्य प्रशासन व वित्त विभागाच्या सहमतीने व वित्त विभागच्या अनौपचारीत संदर्भ क्र.२०१५/३२६/व्यय-९,दिनांक १९.८.२०१५ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१५०८२४१५३८३५४८१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने.

Rajendra Narayan Pimpale

Digitally signed by Rajendra Narayan Pimpale
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Section Officer, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Rajendra Narayan Pimpale
Date: 2015.08.24 15:41:53 +05'30'

**( राजेंद्र. ना. पिंपळे )**

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) अपर मुख्य सचिव (वित्त), मंत्रालय, मुंबई
२) अपर मुख्य सचिव (सा.प्र.वि.) मंत्रालय, मुंबई
३) प्रधान सचिव (सार्वजनिक आरोग्य) मंत्रालय, मुंबई
४) प्रधान सचिव (शालेय शिक्षण) मंत्रालय, मुंबई
५) प्रधान सचिव (उच्च व तंत्र शिक्षण) मंत्रालय, मुंबई
६) प्रधान सचिव (अन्न व नागरी पुरवठा) मंत्रालय, मुंबई
७) प्रधान सचिव (सहकार) मंत्रालय, मुंबई
८) कृषि आयुक्त, महाराष्ट्र राज्य, पुणे.
९) विभागीय आयुक्त औरंगाबाद/ अमरावती/ नागपूर.
१०) सर्व संबंधीत जिल्हाधिकारी.
११) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) १ / २, महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.
१२) महालेखापाल (लेखा परिक्षा) १ / २, महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.
१३) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
१४) श्री. किशोर तिवारी, अध्यक्ष, कै. वसंतराव नाईक शेती स्वावलंबन मिशन, अमरावती.

१५) सह संचालक (सार्वजनिक आरोग्य) अकोला, नागपूर, औरंगाबाद

१६) सह संचालक (शिक्षण), अमरावती, नागपूर, औरंगाबाद

१७) सह संचालक (उच्च शिक्षण ), अमरावती, नागपूर, औरंगाबाद

१८) उपायुक्त (नागरी पुरवठा), अमरावती, नागपूर, औरंगाबाद

१९) सह निबंधक (सहकारी) संस्था, अमरावती, नागपूर, औरंगाबाद

२०) सह संचालक (कृषी), अमरावती, नागपूर, औरंगाबाद

२१) सर्व मंत्रालयीन विभाग.

**प्रत माहितीस्तव,**

१) मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

२) मा. मुख्यमंत्री महोदयांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.

३) मा.मंत्री (म.व पु.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

४) मा.राज्यमंत्री (म.व पु.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

५) निवड नस्ती, कार्यासन (म-७)